**नगर वन उद्यान ही केंद्र पुरस्कृत नवीन योजना सुरु करण्यासाठी राज्य हिस्स्यास मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सावनि -२०१६/प्र.क्र. १३४/फ-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३१ मार्च, २०१७.

**प्रस्तावना -**

नागरी क्षेत्रात आरोग्यदायी पर्यावरण निर्माण करणे आणि त्याचबरोबर शहरांचा देखणेपणा, स्वच्छता, हिरवाई व शाश्वत आखीव रेखीवपणा वृध्दिंगत करण्याच्या अनुषंगाने देशातील सर्व शहरांमध्ये विशेषत: महानगरपालिका व वर्ग-१ दर्जाच्या नगरपालिकांच्या अंतर्गत येणाऱ्या शहरांमध्ये किमान १ वन उद्यान विकसित करण्याकरिता केंद्र सरकारने संपूर्ण देशभरात "नगर वन उद्यान" ही योजना राबविण्याचा निर्णय घेतला आहे.

२. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने सर्व राज्यांना मार्गदर्शक सुचना दिल्या आहेत. त्यानुसार या योजनची ठळक वैशिष्टे पुढीलप्रमाणे आहेत.

**योजनेची ठळक वैशिष्टे :**

१. नगर वन उद्यान योजना हा पथदर्शी प्रकल्प असून तो ५ वर्षाकरिता राबविण्यात येईल.

२. या योजनेचा मुख्य उद्देश हा संपूर्ण देशातील महानगरपालिका/नगरपालिका (वर्ग-१) क्षेत्रामध्ये २०० नगर वन उद्यानांची निर्मिती/विकासकरणे हा राहील.

३. सदर योजना महानगरपालिका/नगरपालिका (वर्ग-१) क्षेत्रातील वनक्षेत्रामध्ये किंवा ज्या महानगरपालिका/ नगरपालिका (वर्ग-१) क्षेत्रामध्ये वनक्षेत्र उपलब्ध नाही तेथील वनेत्तर क्षेत्रामध्ये राबविण्यात येईल. महानगरपालिका/नगरपालिका (वर्ग-१) क्षेत्रातील नागरीकरणामुळे बाधीत व उजाड झालेल्या तसेच अतिक्रमीत वनक्षेत्राचा प्रारंभी यामध्ये समावेश असेल.

४. नगर वन उद्यानासंदर्भातील स्वतंत्र प्रस्ताव संबंधीत स्थानिक प्राधिकरणांनी राज्य कॅम्पा समितीच्या सुकाणू समितीकडे सादर करणे आवश्यक राहील.

५. सदर प्रकल्प हा राज्य कॅम्पाच्या वार्षिक योजना प्रस्तावाचा भाग असणार नाही. याकरिता राष्ट्रीय कॅम्पा सल्लागार परिषदेमार्फत निधी उपलब्ध करुन दिला जाईल. सदरचा निधी राज्य कॅम्पा समितीच्या लेख्यामध्ये जमा करण्यात येईल.

६. या योजनेकरीता स्वतंत्र लेखा ठेवण्यात येईल.

७. सदर योजनेत राज्याचा हिस्सा २०% राहील. त्याकरिता संबंधित राज्यांनी आवश्यक ती तरतूद त्यांच्या अर्थसंकल्पात करणे आवश्यक राहील. सदरचा निधी अपुरा पडल्यास किंवा त्याबाबतची तरतूद न झाल्यास कॅम्पामार्फत निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा विचार करता येईल.

८. या योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने आवश्यक तो समन्वय, संनियंत्रण, प्रसिध्दी व कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देणे इ. करिता पर्यावरण व वन मंत्रालयांतर्गत प्रकल्प व्यवस्थापन पथक स्थापन करण्यात येणार आहे. या पथकाकरिता होणारा खर्च सर्वसाधारणपणे वार्षिक खर्चाच्या २% इतका असेल आणि सदरचा खर्च राष्ट्रीय कॅम्पा सल्लागार परिषदेमार्फत करण्यात येईल.

**३.** नगर वन उद्यान ही केंद्र पुरस्कृत योजना महानगरपालिका/नगरपालिका (वर्ग-१) मधील वन व वनेत्तर क्षेत्रामध्ये सन २०१६-१७ पासून पुढील ५ वर्षाकरिता राबविण्याची बाब आणि त्यासाठी राज्य हिस्सा मान्य करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे, नगर वन उद्यान ही केंद्र पुरस्कृत योजना ८०:२० या प्रमाणात सन २०१६-१७ या आर्थिक वर्षापासून पुढील ५ वर्षाकरिता राज्यामध्ये सुरु करण्यास व यासाठी होणाऱ्या खर्चापैकी २०% हिस्स्यानुसार राज्य शासनावर पडणाऱ्या सर्वसाधारणपणे रु. १०.२० कोटी इतक्या आर्थिकभारास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजना महाराष्ट्रातील २६ महानगरपालीका/नगरपालिका (वर्ग-१) मधील वन व वनेत्तर क्षेत्रामध्ये राबविण्यात येणार आहे. सदर योजना प्रथमत: राज्यात राबविण्याकरिता सन २०१६-१७ मध्ये ७ नगर वन उद्यानाकरिता रु. ७८१.०० लक्ष च्या कामांचा आराखडा केंद्र शासनास सादर करण्यात आलेला आहे. त्यातील ५ मंजूर झाल्या आहेत. तसेच पाच वर्षामध्ये साधरणपणे २६ नगर वन उद्यानांकरीता रू. २ कोटी प्रती वन उद्यान याप्रमाणे साधरणपणे रू. ५२ कोटी इतका खर्च अपेक्षित आहे. या खर्चामध्ये राज्य शासनाचा २० टक्के हिस्सा विचारात घेता, पुढील ५ वर्षात साधरणपणे रू.१०.२० कोटी इतका आर्थिक भार पडणार आहे. त्यानुसार पुढील ५ वर्षात आवश्यक निधीची उपलब्धता करण्यात येईल. तसेच जसजश्या संबंधित महानगरपालिका/नगरपालिका (वर्ग-१) क्षेत्रात योजना तयार होतील तसतश्या हाती घेण्यात येतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०११४११५७९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.04.01 14:13:47 +05'30'

( डी.एल. थोरात )
सह सचिव (वने )

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग.
५. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय
६. सचिव, (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय.
७. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग.
८. सचिव (वने), महसूल व वन विभाग.
९. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१०. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),नागपूर.
११. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१२. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. मुख्य वनसंरक्षक व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
१४. सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
१५. महालेखापाल, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई -४०० ०३२.
१८. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१९. वित्त विभाग, व्यय-०९, अर्थसंकल्प- ०६ मंत्रालय, मुंबई-३२
२०. कार्यासन अधिकारी, फ-२ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२१. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२२. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२३. निवडनस्ती/फ-११.